७०६/नवि२९

**विकास योजना - ठाणे**

मौ.कोलशेत,स.नं.२११/२ (पै) ,क्षेत्र २०००.०० चौ.मी.
ही जमीन आ.क्र.३ "पार्क" या आरक्षणातून वगळून
रहिवास विभागात समाविष्ट करणेबाबत.
महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम,१९६६
चे कलम ३७ (१ अेअे) अन्वये सूचना --

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-टीपीएस-१२०९/अनौ.स.क्र.२२८/प्र.क्र. ४५३/०९/नवि-१२**
**मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२.**
**दिनांक :- ५ डिसेंबर २००९.**

**शासन निर्णय :-** सोबत जोडलेली सुचना राज्य शासनाच्या साधारण राजपत्रात प्रसिध्द करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(अशोक बा.पाटील )
कार्यासन अधिकारी.

प्रति,

१) अप्पर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई- ३२.
२) आयुक्त,ठाणे महानगरपालिका,ठाणे.
३) संचालक नगर रचना महाराष्ट्र राज्य-पुणे.
४) उप सचिव,नगर रचना,मंत्रालय,मुंबई.
५) उपसंचालक, नगर रचना,कोकण विभाग,कोकण भवन,नवि-मुंबई.
६) सहायक संचालक नगर रचना,ठाणे शाखा,जिल्हाधिकारी कार्यालय,कोर्टनाका,ठाणे.
७)व्यवस्थापक शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय,चर्नीरोड,मुंबई.

(त्यांना विनंती की, सोबतची सुचना महाराष्ट्र शासनाचे साधारण राजपत्र भाग -एक,कोकण विभाग, पुरवणीमध्ये प्रसिध्द करण्यात येवून त्याच्या प्रत्येकी ५ प्रती नगर विकास विभाग, मंत्रालय,मुंबई , संचालक नगर रचना,पुणे व उप संचालक नगर रचना,कोकण विभाग, कोकण भवन,नवि-मुंबई यांना पाठविण्यात याव्यात)

८)कक्ष अधिकारी (नवि-२९) ,नगर विकास विभाग यांना विनंती करण्यात येते की, सदरहू सूचना विभागाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करावी.

९) निवडनस्ती (कार्यासन-१२)

KALAM 37 (2).lwp

सूचना
नगर विकास विभाग
मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ५ डिसेंबर २००९.

क्रमांक-टिपीएस-१२०९/अनौ.स.क्र.२२८/०९/प्र.क्र.४५३/०९/नांव-१२

महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम ,१९६६

ज्याअर्थी,ठाणे शहराची सुधारीत विकास योजना (यापुढे ज्यास "उक्त विकास योजना " असे संबोधिले आहे) महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ (यापुढे "उक्त अधिनियम "असा संबोधिलेला) चे कलम ३१ अन्वये शासन अधिसुचना नगर विकास विभाग क्रमांक टिपीएस-१२९७/१३१९/प्र.क्र.१४८/९७/नवि-१२ दिनांक ४ ऑक्टोबर १९९९ अन्वये भागश: मंजूर झाली असून ती दिनांक २२/११/१९९९ पासून अंमलात आली आहे तसेच वगळलेल्या भागाची विकास योजना शासन अधिसुचना क्र.टिपीएस-१२०७/२७४/प्र.क्र.२४/२००१ /नवि-१२ दिनांक ३/४/२००३ अन्वये मंजूर झाली असून ती दिनांक १४/५/२००३ पासून अंमलात आली आहे.

आणि ज्याअर्थी, उक्त विकास योजनेच्या प्रस्तावानुसार स.नं.२९१/२ (भाग) मौ.कोलशेत, क्षेत्र २०००.०० चौ.मी.ही जमिन आरक्षण क्र.३, पार्क या प्रयोजनासाठी आरक्षित आहे. (यापुढे ज्यास "उक्त जमिन " असे संबोधिलेले आहे).

आणि ज्याअर्थी,शासनाच्या महसुल विभागाने उक्त जमिन इंडियन ऑईल कॉर्पोरेशन कर्नाास दिनांक २६/११/२००८ रोजी मुंबईवरील दहशतवादी हल्ल्यात शहीद झालेल्या अधिकाऱ्यांच्या वारसांना पेट्रोलपंपासाठी वितरीत करण्याचे प्रस्तावित केले आहे.

आणि ज्या अर्थी, उक्त जमिन रहिवास विभागात (पेट्रोल पंप वापर अनुज्ञेय करण्यासाठी ) समाविष्ट करणे आवश्यक आहे असे शासनाचे मत झाले आहे. (यापुढे ज्यास "उक्त फेरबदल "असे संबोधिले आहे).

आणि त्या अर्थी, उक्त अधिनियमाच्या कलम ३७ (१ अे) अन्वये प्राप्त असलेल्या अधिकाराचा वापर करुन उक्त विकास योजनेतील उक्त फेरबदले प्रस्तावाच्या अनुषंगाने सदर सुचना राजपत्रात प्रसिध्द झाल्याच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या मुदतीत हरकती/सुचना दाखल करणेसाठी सदरची सुचना निर्गमित करीत आहे. सदर फेरबदलाच्या अनुषंगाने सुचना/हरकती दाखल करण्यासाठी उप संचालक नगर रचना,कोकण विभाग यांची उक्त अधिनियमाच्या कलम १६२ अन्वये अधिकारी म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे. सदर फेरबदलाच्या अनुषंगाने विहित मुदतीत हरकती /सुचना उप संचालक नगर रचना,कोकण विभाग,कोकण भवन ,नवी-मुंबई यांचेकडे दाखल करणेत याव्यात.विहित मुदतीत प्राप्त होणाऱ्या हरकती/सुचनादारांना सुनावणी देवून उप संचालक नगर रचना,कोकण विभाग यांनी त्यांचा

अहवाल शासनास सादर करावा केवळ विहित मुदतीत प्राप्त होणा-या हरकती/सुचना शासनाकडून विचारात घेण्यात येतील.

टिप :-

अ) प्रस्तावित फेरबदल दर्शविणा-या भाग नकाशाची प्रत खालील कार्यालयात कार्यालयीन वेळेमध्ये सर्व सामान्य जनतेच्या अवलोकनार्थ ठेवण्यात आली आहे.

१) उप संचालक नगर रचना,कोकण विभाग, कोकण भवन,नवी-मुंबई.

२) आयुक्त,ठाणे महानगरपालिका,ठाणे.

३) सहाय्यक संचालक नगर रचना,ठाणे शाखा,जि.ठाणे.

ब) सदरची सूचना ही विभागाच्या www.urban.gov.maharashtra.in वेबसाईटवर उपलब्ध राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(अशोक बा.पाटील)
कार्यासन अधिकारी

adisuchana.12.lwp

**GOVERNMENT OF MAHARASHTRA**
**Urban Development Department,**
**Mantralaya, Mumbai 400 032.**
**Dated 5th December, 2009.**

**NOTICE**

No. TPS 1209/UOR 228/CR 453/09/UD-12:

Whereas revised Development Plan for Thane Municipal Corporation (hereinafter referred to as "the said Development Plan") have been sanctioned partly by Government in Urban Development Department under section 31(1) of the Maharashtra Regional and Town Planning Act, 1966 (hereinafter referred to as "the said Act") vide Notification No. TPS-1297/1319/CR-148/97/UD-12 dated 4/10/1999 to come into force with effect from 22/11/1999 and the Development Plan of excluded portion of said Development Plan have been sanctioned vide Govt. Notification No. TPS 1207/274/CR-24/2001/UD-12 dated 3/4/2003 to come into force with effect from 14/5/2003;

And whereas, as per the proposal of said Development Plan the land bearing S. No 291/2(pt) at mouza Kolshet admeasuring about 2000 sq.mt. is affected by Site No.3, Park (hereinafter referred to as "the said land");

And whereas, Govt. in Revenue & Forest Deptt. has proposed to allot the said Govt. land to the Indian Oil Corporation Ltd., for dealership of Petrol Pump to the heirs of martyr in 26th November, 2008 terrorist attack on Mumbai;

And whereas, Govt. finds it necessary to include the said land in Residential Zone for the use of Petrol Pump (hereinafter referred to as "the said modification");

Now therefore in accordance with the provisions contained in section 37(1AA) of the said Act, Govt. hereby publish this notice for inviting suggestions and objections regarding the said modification from the public with reasons thereof within 30 (thirty) days from the date of publication of the notice in Maharashtra Government Gazette. The suggestions and objections shall be addressed to the Dy. Director of Town Planning, Konkan Division, Konkan Bhavan, Navi Mumbai, who is hereby appointed as an officer under section 162 of the said Act and authorised to hear the suggestions and objections which may be received within the aforesaid stipulated period and submit his report to Govt. The suggestions and objections received within the aforesaid stipulated period will only be considered by Govt.

**Note:-**

A) A copy of the plan showing proposed modification is kept open for inspection by the general public in the offices of the following officers:
   1) Dy. Director of Town Planning, Konkan Division, Konkan Bhavan, Navi Mumbai.
   2) The Commissioner, Thane Municipal Corporation, Thane
   3) Assistant Director of Town Planning, Thane Branch, Thane.

B) This notice is also available on Govt. web site **www.urban.maharashtra.gov.in**

**By order and in the name of the Governor of Maharashtra,**

**(Ashok Patil)**
**Section Officer.**